**एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण,**
**२०२३-२८ मध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: धोरण - २०२३ / प्र. क्र. ८१-अ / टेक्स - ५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०६ मार्च, २०२४

**वाचा:-**

(१) शासन निर्णय, सहकार, पणन आणि वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१/ टेक्स -५, दि.०२ जून २०२३.
(२) शासन निर्णय, सहकार, पणन आणि वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१-अ/ टेक्स -५, दि.१२ डिसेंबर २०२३.

**प्रस्तावना:-**

राज्याचे नविन एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२०२८ दि.०२ जून २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले आहे. वस्त्रोद्योग घटकांच्या होणाऱ्या खर्चामध्ये वीज वापरावरील खर्चाचा खुप मोठा वाटा आहे. वस्त्रोद्योग घटकांवरील हा भार कमी करण्यासाठी राज्याचे नवीन एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ मध्ये वस्त्रोद्योग घटकांना भांडवली अनुदान, वीज सवलत, सौर ऊर्जा संयंत्र उभारणीसाठी अनुदान इ. प्रोत्साहने लागू करण्यात आली आहेत. या धोरणामध्ये वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा अनुदानाबाबत परि.क्र.७.१, ७.२.१, ७.२.२, ७.३.१, ७.३.२, ७.५, ७.६, ७.१०, ८.३, १०(१.१) व १०(२.२.४) मध्ये अटी नमूद करण्यात आल्या आहेत. सदर धोरण जाहीर झाल्यानंतर या धोरणाचे वेगवेगळ्या वस्त्रोद्योग घटकांनी, वस्त्रोद्योग संघटनांनी तसेच लोकप्रतिनिधींनी या धोरणामध्ये वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा बाबत काही सुधारणा करण्याबाबत शासनास निवेदने सादर केलेली आहेत. प्रस्तुत प्रकरणी मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्या स्तरावरही वस्त्रोद्योगातील वेगवेगळया घटकाबरोबर बैठका आयोजित करण्यात आल्या होत्या. या सर्व बाबी विचारात घेता, दिनांक ०२ जून २०२३ रोजी जाहीर झालेल्या एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा अनुदानाबाबत सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव दिनांक २५ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये सदर विषयाबाबत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा अनुदानाबाबत सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वरील प्रस्तावनेमध्ये नमूद केल्यानुसार एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा अनुदानाबाबतच्या मूळ तरतूदी ऐवजी खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

अ) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील परि.क्र. ७.२.१ व ७.३.१ मधील सहकारी वस्त्रोद्योग क्षेत्राच्या वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा अनुदानाबाबत असलेल्या मूळ तरतूदीऐवजी खालील प्रमाणे वाचण्यात यावे :-

१. सर्व वस्त्रोद्योग घटकांना (विद्यमान व नवीन) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ च्या धोरण कालावधीकरीता 'परिशिष्ट अ' मध्ये दिलेल्या दरानुसार वीज अनुदान प्रदान केले जाईल. संपूर्ण धोरण कालावधीत वीज अनुदानासाठी कोणतीही कमाल मर्यादा नसेल.

२. वस्त्रोद्योग घटकांना (विद्यमान व नवीन) सौर ऊर्जा प्रकल्पांच्या स्थापनेसाठी भांडवली अनुदान दिले जाईल. या सर्व वस्त्रोद्योग घटकांच्या सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी मार्गदर्शक तत्त्वे खालीलप्रमाणे असतील:-

(I) सौर प्रकल्पासाठी प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) व सौर प्रकल्पासाठी तांत्रिक मंजुरी (Technical sanction) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा- MEDA) कडून घ्यावी. त्यासाठीचे विहित शुल्क मेडाला देय राहील. महाराष्ट्र राज्याचे अपारंपरिक धोरण- २०२० नुसार सौर प्रकल्पाची नोंदणी मेडाकडे करणे अनिवार्य राहील.

(II) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर सौर ऊर्जा प्रकल्प किंमतीच्या २० टक्के किंवा ४.८० कोटी रुपयांपैकी जे कमी असेल तेवढे भांडवली अनुदान सर्व सहकारी वस्त्रोद्योग घटकांना दिले जाईल.

(III) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी भांडवली अनुदानाचे वितरण दोन हप्त्यांमध्ये केले जाईल- (१) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्याचा अहवाल महाऊर्जा कडून प्राप्त झाल्यानंतर अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या ६० टक्के रक्कम वितरीत करण्यात येईल. (२) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर पुढील एक वर्षाचा generation report मेडा कडे प्राप्त झाल्यानंतर त्याअनुषंगाने सौर प्रकल्पाचा CUF (Capacity Utilization Factor) २०% पेक्षा जास्त असल्याची मेडा कडून प्रमाणित करून दिल्यानंतर सौर प्रकल्पासाठी अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या उर्वरित ४० टक्के रक्कम संबंधित घटकास (उद्योगास) वितरीत करण्यात येईल.

(IV) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी प्रति वस्त्रोद्योग घटक फक्त एकवेळ भांडवली अनुदान दिले जाईल.

(V) सौर ऊर्जा प्रकल्पांशी संबंधित सर्व नियमन महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या (MERC) वेळोवेळी जारी केलेल्या किंवा सुधारित केल्या जाणा-या नियमांनुसार असतील.

ब) एकात्मिक व शाश्वत  वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील परि.क्र. ७.१, ७.२.२, ७.३.२, ७.५, ७.६, ७.१०, १०(१.१) मधील खाजगी वस्त्रोद्योग क्षेत्राच्या वीज अनुदान तसेच सौर ऊर्जा अनुदानाबाबत असलेल्या मूळ तरतूदीऐवजी खालील प्रमाणे वाचण्यात यावे :-

१. सर्व वस्त्रोद्योग घटकांना (विद्यमान व नवीन) एकात्मिक  व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ च्या धोरण कालावधीकरीता  'परिशिष्ट अ' मध्ये दिलेल्या दरानुसार वीज अनुदान प्रदान केले जाईल. संपूर्ण धोरण कालावधीत वीज अनुदानासाठी कोणतीही कमाल मर्यादा नसेल.

२. वस्त्रोद्योग घटकांना (विद्यमान व नवीन) सौर ऊर्जा प्रकल्पांच्या स्थापनेसाठी भांडवली अनुदान दिले जाईल. या सर्व वस्त्रोद्योग घटकांच्या सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी मार्गदर्शक तत्त्वे खालीलप्रमाणे असतील:-

(I) सौर प्रकल्पासाठी प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) व सौर प्रकल्पासाठी तांत्रिक मंजुरी (Technical sanction) महाराष्ट्र ऊर्जा  विकास अभिकरण (महाऊर्जा- MEDA) कडून घ्यावी. त्यासाठीचे विहित शुल्क मेडाला देय राहील. महाराष्ट्र राज्याचे अपारंपरिक धोरण- २०२० नुसार सौर प्रकल्पाची नोंदणी मेडाकडे करणे अनिवार्य राहील.

(II)  सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर सौर ऊर्जा प्रकल्प किंमतीच्या २० टक्के किंवा ४.८० कोटी रुपयांपैकी जे कमी असेल तेवढे भांडवली अनुदान सर्व खाजगी वस्त्रोद्योग घटकांना दिले जाईल.

(III)  सौर ऊर्जा  प्रकल्पांसाठी  भांडवली अनुदानाचे वितरण दोन हप्त्यांमध्ये केले जाईल-  (१)  सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्याचा अहवाल महाऊर्जा कडून प्राप्त झाल्यानंतर अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या ६० टक्के रक्कम वितरीत करण्यात येईल. (२) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर पुढील एक वर्षाचा generation report मेडा कडे प्राप्त झाल्यानंतर त्याअनुषंगाने सौर प्रकल्पाचा CUF (Capacity Utilization Factor) २०% पेक्षा जास्त असल्याची मेडा कडून प्रमाणित करून दिल्यानंतर सौर प्रकल्पासाठी अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या उर्वरित ४० टक्के रक्कम संबंधित घटकास (उद्योगास) वितरीत करण्यात येईल.

(IV) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी प्रति वस्त्रोद्योग घटक फक्त एकवेळ भांडवली अनुदान दिले जाईल.

(V) सौर ऊर्जा प्रकल्पांशी संबंधित सर्व नियमन महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या (MERC) वेळोवेळी जारी केलेल्या किंवा सुधारित केल्या जाणा-या नियमांनुसार असतील.

क) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील परि.क्र. ८ (३) मधील सौर ऊर्जा अनुदानाबाबत असलेल्या मूळ तरतूदीऐवजी खालील प्रमाणे वाचण्यात यावे :-

वस्त्रोद्योग घटकांना (विद्यमान व नवीन) सौर ऊर्जा प्रकल्पांच्या स्थापनेसाठी भांडवली अनुदान दिले जाईल. या सर्व वस्त्रोद्योग घटकांच्या सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी मार्गदर्शक तत्त्वे खालीलप्रमाणे असतील:-

(I) सौर प्रकल्पासाठी प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) व सौर प्रकल्पासाठी तांत्रिक मंजुरी (Technical sanction) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा- MEDA) कडून घ्यावी. त्यासाठीचे विहित शुल्क मेडाला देय राहील. महाराष्ट्र राज्याचे अपारंपरिक धोरण- २०२० नुसार सौर प्रकल्पाची नोंदणी मेडाकडे करणे अनिवार्य राहील.

(II) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर सौर ऊर्जा प्रकल्प किंमतीच्या २० टक्के किंवा ४.८० कोटी रुपयांपैकी जे कमी असेल तेवढे भांडवली अनुदान सर्व वस्त्रोद्योग घटकांना दिले जाईल.

(III) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी भांडवली अनुदानाचे वितरण दोन हप्त्यांमध्ये केले जाईल- (१) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्याचा अहवाल महाऊर्जा कडून प्राप्त झाल्यानंतर अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या ६० टक्के रक्कम वितरीत करण्यात येईल. (२) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर पुढील एक वर्षाचा generation report मेडा कडे प्राप्त झाल्यानंतर त्याअनुषंगाने सौर प्रकल्पाचा CUF (Capacity Utilization Factor) २०% पेक्षा जास्त असल्याची मेडा कडून प्रमाणित करून दिल्यानंतर सौर प्रकल्पासाठी अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या उर्वरित ४० टक्के रक्कम संबंधित घटकास (उद्योगास) वितरीत करण्यात येईल.

(IV) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी प्रति वस्त्रोद्योग घटक फक्त एकवेळ भांडवली अनुदान दिले जाईल.

(V) सौर ऊर्जा प्रकल्पांशी संबंधित सर्व नियमन महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या (MERC) वेळोवेळी जारी केलेल्या किंवा सुधारित केल्या जाणा-या नियमांनुसार असतील.

ड) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील परि.क्र. १०(२) २.२.४ मधील सौर ऊर्जा अनुदानाबाबत असलेल्या मूळ तरतूदीऐवजी खालील प्रमाणे वाचण्यात यावे :-

तांत्रिक वस्त्रोद्योग उद्यानातील (Technical Textile Park) प्रत्येक घटकांसाठी सौर ऊर्जा प्रकल्पांच्या स्थापनेसाठी भांडवली अनुदान दिले जाईल. या सर्व युनिटसाठी सौर ऊर्जा प्रकल्पासाठी मार्गदर्शक तत्त्वे खालीलप्रमाणे असतील:-

(I) सौर प्रकल्पासाठी प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) व सौर प्रकल्पासाठी तांत्रिक मंजुरी (Technical sanction) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा- MEDA) कडून घ्यावी. त्यासाठीचे विहित शुल्क मेडाला देय राहील. महाराष्ट्र राज्याचे अपारंपरिक धोरण- २०२० नुसार सौर प्रकल्पाची नोंदणी मेडाकडे करणे अनिवार्य राहील.

(II) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर सौर ऊर्जा प्रकल्प किंमतीच्या २० टक्के किंवा ४.८० कोटी रुपयांपैकी जे कमी असेल तेवढे भांडवली अनुदान तांत्रिक वस्त्रोद्योग उद्यानातील (Technical Textile Park) प्रत्येक घटकांना दिले जाईल.

(III) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी भांडवली अनुदानाचे वितरण दोन हप्त्यांमध्ये केले जाईल- (१) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्याचा अहवाल महाऊर्जा कडून प्राप्त झाल्यानंतर अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या ६० टक्के रक्कम वितरीत करण्यात येईल. (२) सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर पुढील एक वर्षाचा generation report मेडा कडे प्राप्त झाल्यानंतर त्याअनुषंगाने सौर प्रकल्पाचा CUF (Capacity Utilization Factor) २०% पेक्षा जास्त असल्याची मेडा कडून प्रमाणित करून दिल्यानंतर सौर प्रकल्पासाठी अनुज्ञेय भांडवली अनुदानाच्या उर्वरित ४० टक्के रक्कम संबंधित घटकास (उद्योगास) वितरीत करण्यात येईल.

(IV) सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी प्रति वस्त्रोद्योग घटक फक्त एकवेळ भांडवली अनुदान दिले जाईल.

(V) सौर ऊर्जा प्रकल्पांशी संबंधित सर्व नियमन महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या (MERC) वेळोवेळी जारी केलेल्या किंवा सुधारित केल्या जाणा-या नियमांनुसार असतील.

२. सदर शासन निर्णय दिनांक २५ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९८/व्यय-२, दिनांक ०४ मार्च, २०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०६११५५२६७५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIRENDRA SINGH

Digitally signed by VIRENDRA SINGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILES DEPARTMENT, 2.5.4.20=b4f256882ef5e2e3e30ec0593882f0a1d4bba7838441bdf1baafd6db2b2587fe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA1AC1281E05D326F11ABC792C248AC1D6B09689A522356C444CA965C22B87D2, cn=VIRENDRA SINGH
Date: 2024.03.06 12:17:40 +05'30'

**( विरेंद्र सिंह )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह, विधि व न्याय), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई.
५. मा. मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. मा. खासदार (सर्व) महाराष्ट्र राज्य.
९. मा. आमदार (सर्व) महाराष्ट्र राज्य.
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर,
१३. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा व लेखा अनुज्ञेयता/लेखा परिक्षा महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई, नागपूर
१६. व्यवस्थापक, टफ सेल मधिल सर्व बँका (ई-मेलद्वारे).
१७. वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने.
१८. निवड नस्ती (कार्यासन टेक्स-५).